**नागोठणे पाणी पुरवठा योजना ता.रोहा,
जि.रायगड या योजनेच्या आराखडयास व
अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणे.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्र. ग्रापापु-१२१०/प्र.क्र.०१/ पापु-०६**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक: २५ जानेवारी,२०१०**

**संदर्भ:** १) सदस्य सचिव , महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मुंबई यांचे पत्र क्र. मजीप्रा/मनिसंसंकक्ष/तांशा/ग्रामीण/७०८/०९ दि.१४/१२/२००९

२) या विभागाचे क्र.ग्रापापु १२१०/प्र.क्र०१/पापु-०६, दि.१३.१.२०१०

३) अधिक्षक अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, नवीन पनवेल यांचे पत्र क्र.मजीप्रामंप/तांशा-२/१५४/२०१०, दि.१९ जानेवारी,२०१०.

४)पा.पु.व स्व. शासन निर्णय, क्र.ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४/पापु-०७,दि.१ ऑगस्ट, २००९

**प्रस्तावना:-**. नागोठणे गावास यापूर्वी राबविण्यात आलेली योजना २५ वर्षे जुनी झाली असून कालबाह्य झालेली आहे. दरम्यानच्या कालावधीत सदर गावाची लोकसंख्या वाढलेली असून उपलब्ध स्त्रोतातून वाढत्या लोकसंख्येस पाणी अपुरे पडत आहे. त्या अनुषंगाने सदर गावात नवीन पाणी पुरवठा योजना राबविण्याबाबत मा. मंत्री (वित्त) यांच्या दि.२०.११.२००९ च्या बैठकीत मान्यता दिलेली आहे. त्यानुसार नागोठणे पाणी पुरवठा योजनेच्या रु.६,३८,९५,८००/- (ढोबळ) किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांनी संदर्भीय पत्र क्र.१ अन्वये प्रस्ताव सादर केला होता. त्यास अनुसरुन सदरहू योजनेस विभागाच्या दि.१३ जानेवारी,२०१० च्या पत्रान्वये योजनेस तत्वत: मान्यता देण्यात आली आहे. अधीक्षक अभियंता, म.जी.प्रा.मं., नवीन पनवेल यांनी संदर्भीय पत्र क्र.३ अन्वये सदर योजनेच्या अटींची पुर्तता करुन योजनेस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत विनंती केली आहे. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने योजनेस प्रशासकीय मंजुरी देण्याचा शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेऊन **नागोठणे पाणी पुरवठा योजना ता.रोहा, जि.रायगड** या पाणी पुरवठा योजनेच्या रु.६,३८,९५,८००/- ढोबळ (९ टक्के ई.टी.पी. सह) किंमतीच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) सदर योजनेतील कामे महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत करण्यात येतील.

२) प्रस्तुत योजनेची अंमलबजावणी करताना विभागाच्या दि.१.८.२००९ च्या परिपत्रकातील तरतुदीची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

३) सदर योजनेच्या अनुषंगाने आवश्यक ती लोकवर्गणी ग्रामपंचायत, नागोठणे यांनी भरणा करावी.

४) सदर योजनेसाठी जलशुध्दीकरण केंद्र, उंच पाण्याची टाकी इ. साठी लागणारी जागा ग्रामपंचायतीने तातडीन उपलब्ध करुन द्यावी.

५) प्रस्तुत योजनेस सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांनी दि.१४.१२.२००९ रोजी दिली आहे. त्यात नमुद केलेल्या अटींची पुर्तता करण्यात यावी.

वरील अटींची पूर्तता झाल्याशिवाय योजनेची कामे हाती घेण्यात येवू नये.

२. प्रस्तुत योजनेतील दरडोई खर्च हा निकषापेक्षा जास्त असल्याने त्या खर्चास विशेष बाब म्हणून मान्यता देण्यात येत आहे.

३. या योजनेवर होणारा खर्च राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत उपलब्ध होणाऱ्या निधीतून भागविण्यात यावा. हा निधी संपूर्णतः महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे वळती करावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.४४/व्यय-३, दि.२२/१/२०१० अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१००१२७१४११२१००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**Sd/-**

**( मालिनी वि.शंकर )**
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

१) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१
२) मुख्य अभियंता (को.वि.), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण ,कोपरी, ठाणे (पूर्व)
३) जिल्हाधिकारी, रायगड.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड.
५) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, नवीन पनवेल
६) संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा,महाराष्ट्र शासन,पी.एम.टी.बिल्डींग स्वारगेट,पुणे.
७) उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, सी.बी.डी.बेलापूर, नवी मुंबई.
८) वरिष्ट भुवैज्ञानिक भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा,.
९) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१, मुंबई./नागपूर.
१०) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई.
११) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण बांधकाम विभाग, नवीन पनवेल.
१२) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, रायगड.
१३) मु.अ. तथा वि.का.अ.(श्री. सुर्यवंशी) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.
१४) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१५) सर्व कार्यासने, पा. पु. व स्व. वि., मंत्रालय, मुंबई-३२.
१६) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव.

१७) मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव.
१८) अवर सचिव, कार्यासन पापु-१०, पा.पु. व स्व.वि. मंत्रालय, मुंबई.
१९) निवडनस्ती कार्यासन पापु-०६.